**पांझरा मध्यम प्रकल्प मुख्य कालवा व वितरण प्रणाली पाणी वापर संस्थाना हस्तांतर करण्यासाठी उर्वरित कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( ४५४ /२०१४)/सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: २५.०८.२०१४

**पहा :-**

**कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्र जा क्र मुअ/तापाविम /प्रशा ६/ ३४४६/सन २०१४ दिनांक १८.७.२०१४**

**प्रस्तावना**

पाझंरा मध्यम प्रकल्प ता साक्री जि धुळे या योजनेचे काम सन १९७४ मध्ये पूर्ण झाले. संकल्पित सिंचन क्षमता १०७०८ हेक्टर इतकी आहे. सदर प्रकल्पाची कामे ४० वर्षापूर्वीची असल्याने सदर प्रकल्पावर मागील ५ वर्षात फक्त सरासरी २८२१ हेक्टर इतके क्षेत्र सिंचनाखाली आले आहे. सद्यस्थितीत कालव्यावरील सर्व दगडी बांधकामे ढासळलेल्या स्थितीत असून विमोचकाची लोंखडी दरवाजे नव्याने बसविणेसह सर्व बांधकामे संधानकात करणे गरजेचे आहे. कालव्याच्य शेपूट भागापर्यत पाणी पोहचवण्यासाठी कालव्याचे काटछेद पुनर्स्थापित करणे, बांधकामे करणे आवश्यक असल्याने सदर कामे विस्तार व सुधारणा व विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाचे विचारधीन आहे. सदर विशेष दुरुस्ती केल्यामुळे प्रकल्पीय १०७०८ हेक्टर इतके क्षेत्र ओलिताखाली येणार आहे.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे पांझरा मध्यम प्रकल्प मुख्य कालवा व वितरण प्रणाली विशेष दुरुस्ती व विस्तार व सुधारणाची एकूण किंमत रु ४८१.७३ (रु ४३३.६१ लक्ष कामानिमित्त व रु ४८.१२ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे..

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२)सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (miles stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) विशेष दुरुस्तीचे काम जे यांत्रिकी विभागाकडून करुन घेणे शक्य आहे ते यांत्रिकी विभागाकडून करण्यात यावेत.

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

६) दरसूची बाहय बाबीचे दर सक्षम स्तरावर मंजूरी घेवून तांत्रिक मान्यता प्रस्ताव मंजुर करण्यात यावा.

७) कालवा वितरीका दुरुस्ती व आवश्यक बांधकामे करुन पाणी वापर संस्थेकडे हस्तांतरीत करावी.
या कामावर होणारा खर्च खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा विशेष दुरुस्ती १२ (०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ जे १८५ ) या मुख्य लेखाशिर्षखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये
क्र ४२ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२५११५७१३४३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.25 12:28:18 +05'30'

(कि.ल.संखे)

शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,

९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,

१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

११. स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१२. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,

१३. मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४. मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक

१५. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव

१६. आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१८. उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१९. अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव

२०. अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १

२१. अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२२. कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक

२३. उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४. ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,

२५. सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/(४५४ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक २५ .८.२०१४चे प्रपत्र

## परिशीष्ट

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत किंमत( लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | कामावरील खर्च | ४३३.६१ |
| २ | अनुषंगिक खर्च १० टक्के | ४३.३६ |
| ३) | विमा | ४.७६ |
| | एकूण | ४८१.७३ |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.25 12:28:50 +05'30'

(कि.ल.संखे)

शासनाचे कक्ष अधिकारी